# केट शेली आणि अर्ध्या रात्रीची ट्रेन



मार्गरेट वेटर

मराठी : अश्विनी बर्वे

# केट शेली आणि अर्ध्या रात्रीची ट्रेन



मार्गरेट वेटर

चित्र: करेन रिट्ज

## लेखकाची नोंद

कॅथरीन कॅरोल शेली, "केट," चा जन्म २५ सप्टेंबर १८६५ ला आयर्लंड मध्ये झाला होता. ती एक वर्षाची होण्याच्या आत तिच्या आईवडिलानी तिला अमेरिकेत आणले. त्यांनी आयोवाच्या मोइंगोना शहराजवळ एक छोटेसे फार्म खरेदी केले. केटच्या वडिलांनी शिकागो आणि उत्तर-पश्चिमी रेल्वेमार्गावरून दिसणाऱ्या हनी क्रीकच्या समोर आपले घर बांधले आणि तिथेच शेती केली. त्यांनी रेल्वेत नोकरी पण केली.

केटच्या नंतर, त्यांना अजून चार मुले झाली, जेम्स, मेमे, मार्गरेट आणि जॉन. शेली यांच्या घरात जीवन कठीण पण संतोषजनक होते. घर नेहमी चांगले मित्र आणि आनंदाने भरलेले असे.

जेव्हा केट १३ वर्षाची झाली, तेव्हा तिच्या वडिलांचा मृत्यू झाला. एक वर्षाच्या आत १० वर्षाचा जेम्स डेस, मोइनेस नदीत बुडाला. मिसेस शेली वास्तवात या दुःखातून उभारी धरु शकल्या नाही.

केटने फार्म चालवण्याची आणि छोट्या मुलांची काळजी घेण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली.

जेव्हा डेस मोइनेस नदीच्या भागात, एक प्रचंड तूफान आले तेव्हा जीवन कसेबसे लटकत होते. मग केटने संकटाशी सामना करायचे ठरवले आणि ती रात्री एकटी त्या कामासाठी निघाली जे तिला तिचे कर्तव्य वाटत होते.

## मोइंगोना,
## आयोवा ६ जुलै १८८१

पंधरा वर्षाच्या केट शेलीने दोरीवर टाकलेली चादर ओढली.

एक भयानक वादळ येत होते.

केटला वादळ हवेतून जाणवत होते.

जशी ती मोठी टोपली घरात घेऊन आली तेव्हा एक गार हवा वाहत होती.

मग काळे ढग जमा झाले आणि आकाशात अंधार पसरला.



केट आपल्या छोट्या बहिणी आणि भावा बरोबर स्वयंपाक घराच्या खिडकीत उभी होती.

तिने वीज चमकतांना बघितली.

तिने पहाडांमध्ये गडगडाट ऐकला.

मग जोरात पाऊस आला.

जसा पाऊस झाला तेव्हा तिने हनी क्रीकमध्ये पाणी वाढत असल्याचे बघितले.

लवकरच पाणी किनाऱ्याच्या बाहेर निघाले. त्यामुळे त्यांच्या भागात पाणी आले.

“मी जनावरांना गोठ्यातून बाहेर काढायला जात आहे.” केट म्हणाली.

“जर पाणी अशाच प्रकारे वाढत गेले तर जनावरे बुडतील.”

"सावध रहा, पाण्यात घसरू नको,” आईने सांगितले.



केट पहाडावरून खाली पळाली.

ती चिखलाने भरलेल्या पाण्यातून गोठ्यात पोहचली.

तिने दोन्ही घोड्यांना बाहेर काढले आणि त्यांनी उंच जागेवर हाकलले.

तिने गाईंना एका डोंगरावर चढवले.

मग ती परत गोठ्यात गेली. तिने काही डुकराची पिल्ले उचलली आणि त्यांना घरात घेऊन आली.

तोपर्यंत ती पूर्णपणे भिजली होती.

केटने वाळलेले कपडे घातले आणि परत खिडकीत जाऊन उभी राहिली.

पण पावसाने तिला सोडले नाही.

पुराचे पाणी घराच्या जवळ येऊ लागले.

जेव्हा वीज चमकली तेव्हा केटला रेल्वेच्या चमकणारे रूळ दिसले.

रेल्वे रूळ, हनी क्रीकच्या दुसऱ्या बाजूला होते.

केट पाऊसात डोकावून हनी क्रीकच्या रेल्वे रूळ बघण्याचा प्रयत्न करत होती.

या वादळात पूल कसा टिकेल?



जेवण झाल्यावर लहान मुले झोपायला गेली.

नऊ वर्षाची मेमी, आई आणि केट बरोबर जागू इच्छित होते.

सगळेजण स्वयंपाक घरातील टेबलवर वादळामुळे येणाऱ्या संकटावर गप्पा मारत होते.

त्या रेल्वेत काम करणाऱ्या लोकांच्या बाबत काळजी करत होत्या.

अर्ध्या रात्री, एक एक्सप्रेस ट्रेन न थांबता मोइगोना स्टेशनमधून जाईल.

ट्रेन डेस मोइनेस नदीवर बांधलेला लांब पूल पार करेल.

मग ट्रेन केटच्या घराजवळच्या हनी क्रीकवर बांधलेला पूल ओलांडेल.

तो पूल सुरक्षित होता का?



अकरा वाजल्यानंतर काही वेळाने

केट आणि तिच्या आईने इंजिनचा आवाज ऐकला.

इंजिन रुळावरून हळूहळू जात होते.

एक्सप्रेस ट्रेन येण्याच्या आधी रेल्वे कर्मचारी रूळ आणि पुलाची तपासणी करत होते.

रेल्वे कर्मचारी, हनी क्रीकवर तयार केलेल्या पुलाकडे जात होते.

अचानक, इंजिनची शिट्टी जोरात वाजू लागली.

तेव्हा केटने एक भयानक तुटण्याचा आवाज ऐकला.

तिला त्वरित समजून चुकली की पूल तुटला.

केटने गरम इंजिनावर थंड पाण्याचे फवारे टाकण्याचा आवाज ऐकला.

तिने पटकन उडी मारली.

"ओह, आई," केट रडली.

"रेल्वे कर्मचारी, हनी क्रीकमध्ये बुडाले आहेत. मला त्यांना मदत करायला जायला हवे."

अपघाताने मुलांची झोप मोडली.

मुले केटला जॅकेट आणि टोपी घालतांना चुपचाप बघत राहिले.

मग केटने आपल्या वडिलांची रेल्वेचा कंदिल पेटवला.







“तू जाऊ शकत नाही, केट,“ आई म्हणाली.

“तिथे खूप भयानक काही तरी घडले असेल.”

"मला जावेच लागेल, आई,” केटने उत्तर दिले.

"हनी क्रीकमध्ये आता कोणी माणूस जिवंत असू शकतो.

आणि मला अर्ध्या रात्रीची एक्सप्रेस ट्रेन रोखायला हवे.”

"कृपया, केट," आई म्हणाली.

“जाऊ नको. पुराचे पाणी आता आपल्या दरवाज्यापर्यंत येईल.”

“जर इथे आपले वडिल असते, तर आपण त्यांच्या मदतीला गेलो नसतो का?” केटने विचारले.

“तू बरोबर करत आहे,” आईने आपली सहमती व्यक्त केली.

"अच्छा जा, पण सावध रहा. आम्ही तुझ्यासाठी प्रार्थना करू.”

तुटणाऱ्या पुलापर्यंत जाण्यासाठी केट पूर आलेला भाग ओलांडू शकली नाही.

म्हणून तिने आपल्या घराच्या मागचा रस्ता निवडला.

तिथून ती त्या रूळावर पोहचू शकली असती जे पहाडावर जातात.



पहाडाच्या खालून पाणी वाहत होते.

केट पडलेल्या झाडांवर चढून गेली.

तिचा स्कर्ट ओल्या झाडांमध्ये अडकला.

तिचे बूट चिखलात फसले.

पण तिने आपल्या वडिलांचा कंदिल आपल्या समोर धरला आणि चालत राहिली.

शेवटी ती रेल्वे रुळावर पोहचली.



केट रूळा बरोबरच तुटलेल्या पुलाकडे धावत गेली.

तिने हनी क्रीकमध्ये गाढ पाणी येताना पाहिले.

इंजिन किंवा चालक यापैकी कोणतीही व्यक्ती ती पाहू शकली नाही.

ते बुडाले असतील का?

तेव्हा केटला एक आवाज ऐकू आला.

वादळाच्या आवाजामुळे तिला यावर विश्वास बसत नव्हता.

पण तिला परत आवाज आला.

हो. कोणीतरी बोलवत होते.



वीज चमकली.

केटने कोणालातरी पाण्याच्या वर झाडाची फांदी पकडलेले पाहिले.

गड़गडाट झाला.

जशी गर्जना कमी झाली, केटने परत आवाज ऐकला.

आता ती दोन व्यक्तींचा आवाज ऐकू शकत होती.पण वादळात त्यांचे शब्द समजत नव्हते..

“थांबा! थांबा!" केट ओरडली. “मी मदत घेऊन परत येते.”

केटने कंदिल मागे-पुढे केला.

यामुळे लोकांना कळले की त्यांचा आवाज ऐकला गेला आहे आणि ती मदतीला येत आहे.





केट, मोइनगोना स्टेशनकडे धावू लागली.

तिच्याकडे जास्त वेळ नाही.

अर्ध्या रात्रीच्या आत, एक्सप्रेस ट्रेन येण्याच्या आत तिला स्टेशनवर पोहचायचे आहे.

केट रूळाकडे धावली.

डेस मोइनेस नदी पुलावर पोहचण्याच्या आधी तिला पुराच्या पाण्याचा आवाज ऐकू आला..

तिने पुलावरचा रस्ता दिसावा म्हणून तिने कंदिल पकडून ठेवला होता..

पण जशी ती पुढे गेली हवेच्या वेगामुळे कंदिलाची छोटी वात विझली.

केटने अंधारात बघितले.

मोइनगोना स्टेशनपर्यंत पोहचण्यासाठी तिला नदी पार करावी लागणार होती.

तिच्या समोर लांब लाकडी पूल होता.

रुळाच्या बाजूने एक छोटा रस्ता होता.

पण तिथले काही बोर्ड गायब झाले होते.

तिथे पकडण्यासाठी काहीही नव्हते.

केट दिवसा उजेडी सुद्धा तो पूल पार करायला घाबरत असे.

मग ती या वादळातून, अंधारात तो पूल पार करू शकली असती?





केटने आपल्या दोन्ही हातानी पुलामधील अंतर जाणून घेतले, त्यामुळे ती स्वतः खाली पडणार नाही.

खिळे आणि लाकडाचे धारदार कोपरे तिच्या हातांना आणि गुडघ्याना कापत होते आणि तिचा स्कर्ट फाटत होता.

तिने रुळांना पकडले त्यामुळे ती वाहून जाणार नाही.

केटने हनी क्रीक मधल्या रेल्वे कर्मचाऱ्यांचा विचार केला.

तिने ट्रेनमध्ये प्रवास करणाऱ्या सर्व प्रवाशांचा विचार केला जे तुटलेल्या पुलाकडे वेगाने येत होते.

मग ती आपल्या हात आणि गुडघ्यांवर बसली आणि अडखळत चालू लागली.

पुरामुळे नदीवरची झाडे आणि फळ्या पुलाला टक्कर देत होत्या, ज्यात तो हलत होता.

जेव्हा ती पुलाच्या मधोमध पोहचली, तेव्हा अचानक रात्री विजेच्या प्रकाशामुळे तिला रस्ता दिसू लागला.

तिने वर बघितले.

एक विशाल वृक्ष नदीतून वाहत तिच्याकडे येत होता.

निश्चितपणे ते झाड पुलाला जाऊन टक्कर देईल. केटने आपले डोळे बंद केले आणि प्रार्थना करू लागली.





दुसऱ्याच क्षणी नदीने झाडाला पाण्यात खाली ओढले.

केटला लाकडाच्या रस्त्याच्या खाली झाड जात असतांना अनुभवले. मग झाड वाहत गेले.

केट भीतीने कापत होती, पण ती आराम करण्यासाठी थांबू शकत नव्हती.

तिला माहीत होते कि आता अर्धी रात्र होणार आहे.

तिला अर्ध्या रात्री येणाऱ्या एक्सप्रेस ट्रेनच्या आधी स्टेशनवर पोहचायचे होते.

शेवटी केटच्या हाताला जमीन लागली.

तिने नदी पार केली होती.

मोइंगोना स्टेशन आता अर्धा मैलापेक्षा कमी दूर होते.

मग ती आपल्या पायावर उभी राहिली आणि पळू लागली.

तिचे हृदय धडधडू लागले. तिच्या गळ्यात दुःखी लागले. पण पाऊसात तिला स्टेशनवर प्रकाश दिसला.





केटने रेलवे स्टेशनचा दरवाज़ा उघडला.

आत बसलेले लोक वळाले आणि तिच्याकडे बघू लागले.

केटचे कपड़े फाटलेले आणि मळलेले होते.

तिच्या जुन्या टोपीतून पाणी गळत होते.

तिने बोलण्याचा प्रयत्न केले पण तिच्या तोंडातून एक शब्दही बाहेर पडला नाही.

शेवटी ती जोरात श्वास घेऊ लागला,

"हनी क्रीक मध्ये इंजिन पडले आहे. एक्सप्रेस ट्रेन रोखा."

त्यानंतर केट फरशीवर पडली.

"ती मुलगी नक्कीच वेडी असेल," कोणीतरी म्हटले.

लेकिन स्टेशन का एजेंट केट को जानता था.

“तिचे म्हणणे आहे की पूल तुटला आहे,” तो ओरडला.

“आपल्याला एक्सप्रेस ट्रेनला त्वरित थांबवावी लागेल.”

तो लगेच टेलीग्राफ जवळ गेला आणि मोइंगोनाच्या आधीचे स्टेशन ओग्डेनसाठी त्याने संदेश टाईप केला.

एक्सप्रेस ट्रेन थांबवा...पूल तुटला आहे...
एक्सप्रेस ट्रेनला थांबवा!

दुसऱ्या माणसाने एक कंदिल धरला. त्यानंतर तो प्लेटफार्मकडे धावला.

जर टेलीग्राफने संदेश पोहचला नाहीतर तो एक्सप्रेस ट्रेनला लाल झेंडा दाखवून रोखू शकला असता.

दोनशे लोक घेऊन एक्सप्रेस, अजूनही तुटलेल्या पुलाकडे वेगाने येत होती.







पण केटचा निरोप वेळेवर आला.

रेल्वे कर्मचाऱ्यानी ओग्डेनमध्ये एक्सप्रेस ट्रेन रोखली.

तो त्या रात्री पाठवलेला किंवा प्राप्त केलेला शेवटचा टेलीग्राफ संदेश होता.

वादळामुळे ४० मैलापर्यंतची टेलीग्राफ सेवा ठप्प केली होती.

कोणीतरी केटला उठवून खुर्चीवर बसवले.

मग कोणतरी केटला प्यायला पाणी दिले.

"हनी क्रीकमध्ये अजूनही दोन माणसे जिवंत आहेत," केट म्हणाली.

“मी त्यांना पाण्यात पडलेल्या झाडांना पकडतांना पाहिले आहे.”



"चला आपण त्यांना वाचवण्याचा प्रयत्न करू," एक माणूस म्हणाला.

“केट तू आम्हांला मदत करशील का?” दुसरा माणूस म्हणाला.

“तू आम्हांला दाखव ते कुठे आहेत ते?”



केट रक्षक दलाबरोबर इंजिनमध्ये चढली.

त्यांनी डेस मोइनेस नदी पार केली.

हा तोच पूल होता ज्यावरून अडखळत केट आली होती.

मग हनी क्रीकच्या तुटलेल्या पुलावर इंजिन थांबले.

सगळे लोक मिळून ओरडले आणि पाण्यात फसलेल्या लोकांनी त्यांना उत्तर दिले.

ते अजूनही झाडांना लटकून होते.

पण पुरामुळे त्याच्यापर्यंत पोहचण्यासाठी काही रस्ता नव्हता.



केटने आपल्या घराच्या मागच्या बाजूच्या पहाडावर बचाव दलाचे नेतृत्व केले.

ती त्यांना जंगलाच्या रस्त्याने वरच्या बाजूने एका दुसऱ्या पुला पर्यंत घेऊन गेली.

तिकडून त्यांनी हनी क्रीक पार केली, आणि शेवटी त्यांनी त्या दोन फसलेल्या लोकांना वाचवले.

## शेवटचे शब्द

केट घरी आली आणि खूप वेळपर्यंत झोपून राहिली. जेव्हा तिला जाग आली, तेव्हा तिच्या परिवाराने,मित्रांनी आणि शेजाऱ्यांनी तिचे आनंदाने स्वागत केले. ते तिच्या साहसाबद्दल ऐकण्यास उत्सुक होते. वार्ताहर आले. देशभरच्या वर्तमानपत्रातील तिच्या धाडसाची कहाणी लोकांनी वाचली. लवकरच सर्व देशाला केट शेलीच्याबाबत समजले. रेल्वेरोड कंपनीने केटला शंभर डॉलर आणि रेल्वेमार्गाने आजीवन मोफत प्रवास करण्याचा पास मिळाला. केटच्या सम्मानासाठी लोकांनी कविता आणि गाणी लिहिली. आयोवा राज्याने केटला, एक स्वर्ण पदकाने सम्मानित केले.

पण तिला दिल्या जाणाऱ्या सन्मानांमध्ये रेल्वेप्रवासी मित्रांनी केलेला सन्मान जास्त आवडला. जेव्हा ट्रेन तिच्या घरासमोरून जात असे, तेव्हा ते ट्रेनला घरच्या समोर थांबवत ज्यामुळे केट तिथे उतरून आपल्या घरी पोहचू शकेल.

